विकलांग अपत्य असलेल्या राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना विशेष बाल संगोपन रजा मंजूर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१६/प्र.क्र.५७/सेवा-६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०९ मार्च, २०२३

**वाचा : १. विकलांग व्यक्तींसाठी (समान संधी, हक्कांचे संरक्षण आणि पूर्ण सहभाग) अधिनियम, १९९५**
**२. दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६**
**३. शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २१.०९.२०१६**

**प्रस्तावना :**

विकलांग व्यक्तींसाठी (समान संधी, हक्कांचे संरक्षण आणि पूर्ण सहभाग) अधिनियम, १९९५ हा अधिनियम अधिक्रमित करुन, दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ हा नवीन अधिनियम अस्तित्वात आला आहे. तसेच, केंद्र शासनाच्या धर्तीवर विकलांग अपत्याच्या वयोमर्यादेची अट शिथिल करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ मधील कलम २(ZC) अंतर्गत, परिशिष्टात नमूद केल्यानुसार दिव्यांगत्वामध्ये खालील प्रवर्गांचा समावेश केला आहे. त्या प्रवर्गातील दिव्यांग अपत्य असणाऱ्या शासकीय महिला कर्मचाऱ्यास तसेच अपत्य असून पत्नी नसलेल्या शासकीय पुरुष कर्मचाऱ्यास देखील दिनांक २१ सप्टेंबर २०१६ च्या शासन निर्णयानुसार विहित केलेली बाल संगोपन रजा अनुज्ञेय राहील :-

१. Loco Motor Disability (अस्थिव्यंग)
२. Leprosy Cured Person (कुष्ठरोग निवारित/मुक्त)
३. Cerebral Palsy (मेंदूचा पक्षाघात)
४. Dwarfism (शारिरीक वाढ खुंटणे)
५. Muscular Dystrophy (स्नायुंची विकृती)
६. Acid Attack Victims (आम्ल हल्ला पिडीत)
७. Blindness (पूर्णत: अंध)
८. Low Vision (अंशत: अंध)
९. Hearing Impaired (Deaf and hard of Hearing) (कर्णबधिर/ ऐकू कमी येणे)
१०. Speech and Language Disability (वाचा/ भाषा दोष)

११.Intellectual Disability (बौद्धीक अक्षम)

१२.Specific Learning Disability (विशिष्ट अध्ययन अक्षम)

१३.Autism Spectrum Disorder (स्वमग्न)

१४.Mental Behaviour / Mental illness (मानसिक वर्तन/ मानसिक आजार)

१५.Multiple Sclerosis (हातापायांतील स्नायू कमजोर/ शिथिल होणे)

१६.Parkinsons disease (कंपवात)

१७.Haemophilla (अधिक रक्तस्त्राव)

१८. Thalassemia (रक्ताची कमतरता)

१९.Sickle Cell Disease (रक्तात हिमोग्लोबीनचे प्रमाण कमी होणे)

२०.Chronic Neurological Condition (मज्जासंस्थेचे तीव्र आजार)

२१.Multiple Disabilities (बहुविकलांग)

उपरोक्त नमूद दिव्यांगत्व हे दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ मधील दिव्यांगत्वाच्या व्याख्येप्रमाणे असणे अनिवार्य राहील.

२. सदर रजा अनुज्ञेयतेच्या अटी दिनांक २१ सप्टेंबर २०१६ च्या शासन निर्णयानुसार विहित केलेल्या आहेत. या अटींपैकी अनुक्रमांक (iii) येथे नमूद केलेली, सदर रजा विकलांग अपत्याच्या वयाच्या २२ वर्षापर्यंत घेता येईल, ही अट वगळण्यात येत आहे. तसेच सदर रजा एका वेळेस पाच दिवसांपेक्षा कमी कालावधीसाठी घेता येणार नाही, या अटीचा नव्याने समावेश करण्यात येत आहे.

३. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मध्ये आवश्यक त्या सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३०९१४२१५०३५०५ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANITA GOPAL LAD

Digitally signed by ANITA GOPAL LAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
Date: 2023.03.09 14:27:24 +05'30'

**(अनिता लाड)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

२) सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य.

३) मा.राज्यपाल यांचे सचिव.

४) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.

५) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव.

६) सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

७) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.

९) मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.

१०) प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.

११) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

१२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

१३) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.

१५) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.

१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.

१७) कुलगुरु, कृषि विद्यापीठे/बिगर कृषि विद्यापीठ.

१८) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.

१९) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

२०) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.

२१) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.

२२) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.

२३) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली.

२४) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक

२५) सर्व विभागीय आयुक्त.

२६) सर्व जिल्हाधिकारी.

२७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

२८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

२९) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.

३०) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.

३१) संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई.

३२) सह संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/ नागपूर.

३३) वित्त विभागातील सर्व कार्यासने.

३४) निवड नस्ती.